**पोलीस भरती अर्जाच्या ऑनलाईन स्वीकृतीपोटी प्राप्त होणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी भारतीय रिझर्व्ह बँकेत स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) उघडण्यास मंजुरी देणेबाबत...**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक-आरसीटी-०३११/प्र.क्र.४९०/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ सप्टेंबर २०११

संदर्भ : (१) शासन पत्र, गृह विभाग क्रमांक-आरसीटी-०३१०/प्र.क्र.६५८/पोल-५अ, दिनांक ६ जुलै २०११

(२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे पत्र क्रमांक-प्रशि/पोशि-भरती/प्रवेश शुल्क/२०११/३५१४, दिनांक ४ ऑगस्ट २०११

(३) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे पत्र क्रमांक-प्रशि/पोशि-भरती/प्रवेश शुल्क/२०११/३६३९, दिनांक १६ ऑगस्ट २०११

(४) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे पत्र क्रमांक-प्रशि/पोशि-भरती/प्रवेश शुल्क/२०११/३७४४, दिनांक २० ऑगस्ट २०११

(५) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे पत्र क्रमांक-प्रशि/पोशि-भरती/प्रवेश शुल्क-२०११/२०११/४०३६, दिनांक १२ सप्टेंबर २०११

**प्रस्तावना :**

पोलीस शिपाई भरती २०११ ची भरती प्रक्रिया ऑनलाईन पद्धतीने करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर भरती प्रक्रिया राबविण्यासाठी उपलब्ध असलेला अल्प कालावधी लक्षात घेऊन, गृह विभागाच्या दिनांक ५ जुलै २०११ च्या अन्वये Urgent Order Procedure Certificate निर्गमित करण्यात आले. आता पोलीस शिपाई भरती प्रक्रिया राबविण्यासाठी उमेदवारांकडून आकारण्यात येणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी व सदर भरतीसाठी खर्च करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या पदनामाने स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

पोलीस शिपाई भरती २०११ ची भरती प्रक्रिया ऑनलाईन पद्धतीने करण्यात येणार असून, या भरतीमध्ये सहभागी होणाऱ्या उमेदवारांकडून आकारण्यात येणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या

पदनामाने भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथे महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ अंतर्गत नियम-४८८, ४९४ व ४९५ मधील तरतुदीनुसार स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन मान्यता खालील विहित अटी व शर्तींचे आणि कार्यपद्धतीचे काटेकोरपणे अनुपालन करण्याच्या अधीन राहिल.

(१) भारतीय रिझर्व्ह बँकेत स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास वित्त विभागाने व महालेखापालांनी मान्यता दिली आहे. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी प्रथम आवश्यक ते प्राधिकारपत्र (Authority Letter) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडून प्रथम प्राप्त करुन घ्यावे. तद्नंतर भारतीय रिझर्व्ह बँकेत स्वीय प्रपंजी खाते उघडावे.

(२) उमेदवारांकडून ऑनलाईन पद्धतीने प्राप्त होणाऱ्या अर्जासोबत भरावयाच्या परीक्षा शुल्काची रक्कम संबंधित उमेदवाराने स्टेट बँक ऑफ इंडियाच्या शाखेत भरल्यानंतर, बँकने ती टी+३ (T+3) तत्त्वावर शासनाच्या एकत्रित निधीमध्ये म्हणजेच "००५५-पोलीस, १०३-फी, दंड व जप्तीच्या रकमा, (०१)(०६)-भरती, संगणक संकेतांक (प्रस्तावित)" **(0055-Police, 103-Fees, Fines and Forfeitures, (01)(06) Recruitment, CRC Code (Proposed)** या विभागाच्या जमा लेखाशीर्षाखाली जमा करावी.

(३) पोलीस भरतीची निकड लक्षात घेता परीक्षा शुल्कापोटी ००५५ या लेखाशीर्षाखाली जमा होणारी रक्कम अर्थसंकल्पित होईपर्यंत, परीक्षा शुल्कापोटी जमा होणाऱ्या रकमेसाठी "२०५५-पोलीस, (००)(००१) संचालन व प्रशासन, (००)(०२) भरती" **(2055-Police, (00)(001) Direction and Administration, (00)(02) Recruitment)** या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाने तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेली रक्कम कॉन्ट्रा क्रेडीट पद्धतीने "२०५५-पोलीस कॉन्ट्रा क्रेडिट, ८४४३-नागरी ठेवी (स्वीय प्रपंजी लेखा), १०६-वैयक्तिक ठेवी" **(2055-Police per contra credit to 8443-Civil Deposit, 106-Personal Deposit)** या लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.

(४) वरील परिच्छेद-२ (३) प्रमाणे करावयाच्या कार्यपद्धतीस काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. सदर पोलीस भरती प्रक्रिया राबविण्यास अडचण उद्भवू नये यासाठी "मागणी क्रमांक-बी-१, २०५५-पोलीस या मुख्य लेखाशीर्षाखाली कार्यान्वयन यंत्रणांच्या अधिपत्याखालील विविध उपशीर्षाखाली १३-कार्यालयीन खर्च अथवा इतर उद्दिष्टाखाली" सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या अनुदानामधून पोलीस भरती प्रक्रिया २०११ चा अनुषंगिक खर्च भागविण्यात यावा.

(५) वरील परिच्छेद-२ (३) प्रमाणे स्वीय प्रपंजी लेख्यात जमा झालेल्या रकमेतून परीक्षेच्या कामासाठी आवश्यक खर्च भागविण्यासाठी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय यांनी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांना आवश्यक तेवढी रक्कम आहरित करण्यास परवानगी द्यावी.

(६) परीक्षा शुल्कापोटी स्वीय प्रपंजी लेख्यात जमा केलेल्या रकमेइतकी रक्कम संबंधित विभागाच्या महसूली जमा शीर्षाखाली जमा करण्यासाठी महाराष्ट्र कोषागार नियम, नमुना-२८ मध्ये अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयास निरंक रकमेचे देयक सादर करण्यात यावे. देयकामध्ये वर्गीकरणासाठी असलेल्या जागेत खर्चाचा क्रॉस रेफरन्स कोड बिनचूक लिहावा. खर्च झालेली सर्व रक्कम विभागाच्या महसूली जमा शीर्षात ट्रान्स्फर क्रेडिट पद्धतीने जमा करण्यात यावी. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय यांनी निरंक रकमेचे देयक मंजूर करावे.

(७) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय यांच्याकडून स्वीय प्रपंजी लेख्यात जमा केलेल्या परीक्षा शुल्काच्या रकमेबाबतचे प्रमाणपत्र घेण्यात यावे.

(८) सदर प्रमाणपत्राच्या आधारे "२०५५-पोलीस, (००)(००१) संचालन व प्रशासन, (००)(०२) भरती" या लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षाच्या येत्या विधीमंडळाच्या अधिवेशनात (डिसेंबर २०११ अथवा मार्च २०१२ मध्ये) परीक्षा शुल्काच्या रकमेसाठी पूरक मागणीव्दारे अर्थसंकल्पिय तरतूद करुन घ्यावी.

(९) सन २०११-१२ या वर्ष अखेर स्वीय प्रपंजी लेख्यात शिल्लक असलेली रक्कम महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ अंतर्गत नियम-४९५ मधील तरतुदीनुसार राज्याच्या एकत्रित निधीत "००५५-पोलीस" मध्ये जमा करण्यात यावी.

(१०) सदर स्वीय प्रपंजी लेखा खाते भरती मोहिम पूर्ण होईपर्यंत कार्यान्वित राहिल. तथापि सदर खाते दिनांक ३१ मार्च २०१२ नंतर पुढे चालू राहणार नाही व दिनांक ३१ मार्च २०१२ रोजी शिल्लक असलेली सर्व रक्कम शासनाच्या एकत्रित निधीमध्ये विभागाच्या जमा शीर्षाखाली जमा करण्यात यावी. सदर खाते पुढे चालू ठेवणे आवश्यक असल्यास दिनांक १० एप्रिल २०१२ पर्यंत वित्त विभाग व महालेखापाल यांची पूर्वमंजुरी घेणे आवश्यक राहिल.

(११) परीक्षा शुल्काव्यतिरिक्त अन्य कोणतीही रक्कम सदर स्वीय प्रपंजी लेखा खात्यात जमा करता येणार नाही आणि परीक्षा शुल्क रक्कम ही महसूली जमा ( Revenue Receipt) असल्याने सदर स्वीय प्रपंजी लेखा खाते बंद केल्यावर शिल्लक रक्कम विभागाच्या महसूली जमा शीर्षाखाली जमा करणे आवश्यक राहिल.

(१२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी स्वीय प्रपंजी लेख्यांमध्ये फक्त परीक्षा शुल्काच्या रकमा जमा कराव्यात व या रकमेतून त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल व त्याचा सविस्तर तपशील ठेवावा.

(१३) स्वीय प्रपंजी लेख्याबाबत तपशीलवार लेखे ठेवणे, विहित नियतकालिक विवरणे महालेखापाल यांना सादर करण्याची जबाबदारी संबंधित स्वीय प्रपंजी लेखा खाते धारकाची राहिल. संबंधित स्वीय प्रपंजी लेखा खाते धारकाने अधिदान व लेखा कार्यालयाच्या लेख्याबरोबर दरमहा खर्चाचा ताळमेळ घालावा.

(१४) सदर स्वीय प्रपंजी लेखा खात्याचे लेखा परीक्षण महालेखापाल कार्यालयाकडून करुन घेण्यात यावे.

(१५) महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील स्वीय प्रपंजी लेख्यांशी संबंधित सर्व अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

३. पदभरती मोहिमेंतर्गत अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या पदनामाने उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये जमा होणाऱ्या रकमेतूनच या प्रयोजनार्थ होणारा खर्च भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२१८/११/कोषा-प्र-५, दिनांक २३ सप्टेंबर २०११ व महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-टीएम/सीएच-२/पीएलए/युओआर/जनरल/२०११-१२/८०५, दिनांक २१ सप्टेंबर २०११ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०९२३१५०९५६७७) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सुं.ग.सोनवणे )
**शासनाचे उपसचिव, गृह विभाग.**

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

D:\2011\Police Recruitment/PR-L/20

४) अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) अपर पोलीस महासंचालक, पोलीस वाहतूक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) अपर पोलीस महासंचालक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) पोलीस संचालक व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पोलीस गृहनिर्माण मंडळ, मुंबई.
९) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
११) सर्व पोलीस आयुक्त.
१२) विशेष पोलीस महानिरीक्षक, फोर्स वन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र.
१४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक
१५) सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक.
१६) सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल.
१७) सह पोलीस आयुक्त, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई.
१८) सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र.
१९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२०) महालेखापाल, (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र , नागपूर.
२२) महालेखापाल, (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२५) सर्व कोषागार अधिकारी.
२६) मा.अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक.
२७) मा.प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक.
२८) मा.प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक.
२९) लेखा अधिकारी (टीएम शाखा), महालेखापाल कार्यालय, मुंबई.
३०) कक्ष अधिकारी (कोषा-प्र-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१) निवड नस्ती / पोल-५अ